रत्नागिरी विमानतळाच्या विकासासाठी भारतीय तटरक्षक दल, रत्नागिरी यांना जमिन हस्तांतरणाबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र. मविवि-१२१७/प्र.क्र.१४६/२८-अ**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ३२.
दि. १३ जून, २०२३.

वाचा :-१. शासन निर्णय क्र. मविवि-१२१७/प्र.क्र.१४६/२८-अ,दि.२५/७/२०१७.
२. शासन निणर्य क्र.-मविवि-१२१७/प्र.क्र.१४६/२८-अ, दि.०९/०५/२०१८
३. शासन ज्ञापन क्र.-बीयुडी-१६१८/प्र.क्र.१०२/२८-अ, दि.१०/१२/२०१८
४. शासन ज्ञापन क्र.-बीयुडी-१६१८/प्र.क्र.१०२/२८-अ, दि.१६/०३/२०१९
५. शासन ज्ञापन क्र.-बीयुडी-१६१९/प्र.क्र.५१/२८-अ, दि.२१/०९/२०१९
६. शासन निर्णय क्र. मविवि-१२१७/प्र.क्र.१४६/२८-अ,दि.०४/१०/२०२२.
८.उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी, मुंबई यांचे पत्र क्र.मविविकं २०१८/प्र.क्र.४२/भुसं/१२२, दि.१९.०४.२०२२.
९. मा.शक्ती प्रदत्त समितीच्या दि.२५.०५.२०२३ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :**

केंद्र शासनाच्या Regional Connectivity Scheme अंतर्गत पहिल्या टप्प्यात रत्नागिरी विमानतळाचा समावेश करण्यात आलेला आहे. सदरहू विमानतळ भारतीय तटरक्षक दलाच्या ताब्यात आहे. सदर विमानतळाची सद्यस्थितीतील धावपट्टी १३७२ मी. (४५०० फूट) लांबीची आहे. तथापि, Regional Connectivity Scheme योजनेअंतर्गत रत्नागिरी विमानतळ Bombardier/ ATR ७२ प्रकारची विमाने वाहतुकीसाठी व इतर अनुषंगिक सेवा पुरविण्यास सक्षम व्हावा, याद्दष्टीने सदर धावपट्टीची लांबी वाढवून ती २१३५ मी. (७००० फूट) करण्याची मागणी तटरक्षक दलाने केली होती. याखेरीज,रत्नागिरी विमानतळावरुन सुरक्षित नागरी विमान वाहतूक व्हावी, याद्दष्टीने आवश्यक त्या सुविधा (Parallel Taxi Track, Isolation Bay, Dispersal & other allied facilities) निर्माण व्हाव्या यासाठी सद्यस्थितीत कार्यरत असलेल्या धावपट्टीच्या पश्चिमेस मिरजोळे गावातील सुमारे २५ हेक्टर जमीन राज्य शासनाने विनामूल्य उपलब्ध करुन द्यावी, अशी भारतीय तटरक्षक दलाने मागणी केली होती. याअनुषंगाने, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी, मुंबई यांना शासन निर्णय दि.२५/०७/२०१७ अन्वये भूसंपादन संस्था म्हणून घोषित करण्यात आले आहे.

२. रत्नागिरी विमानतळ विकासासंदर्भात जमीनीचे भूसंपादन करणे व त्यासाठी आवश्यक निधीस प्रशासकिय व वित्तीय मान्यता शासन निर्णय दिनांक ९/५/२०१८ अन्वये देण्यात आली आहे. तसेच, रत्नागिरी विमानतळ पूर्ण क्षमतेने कार्यान्वित करण्यासाठी सदर विमानतळाच्या मौजे तिवंडेवाडी व मौजे मिरजोळे ता.जि.रत्नागिरी येथील एकूण क्षेत्र २७.९९.५९ हे.आर.चौ.मी संपादन करावयाचे अनुषंगाने दिनांक ०४ ऑक्टोबर, २०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये रू.९७.४४ कोटीस सुधारित प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात आली आहे.

रत्नागिरी विमानतळाच्या विस्तारिकरणांतर्गत मौजे तिवंडेवाडी व मौजे मिरजोळे ता.जि.रत्नागिरी येथील एकूण क्षेत्र २७.९९.५९ हे.आर.चौ.मी क्षेत्रापैकी १९.०१ हे.आर क्षेत्राचे भारतीय तटरक्षक दल, रत्नागिरी यांना हस्तांतरण करण्यास मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव मा.मुख्य सचिव महोदयांच्या अध्यक्षतेखालील शक्ती प्रदत्त समितीच्या दि.२५.०५.२०२३ रोजीच्या बैठकीत सादर करण्यात आला होता. या प्रस्तावास मा.शक्ती प्रदत्त समितीच्या बैठकीत मान्यता देण्यात आली असून त्यानुसार खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय : -**

रत्नागिरी विमानतळाच्या विस्तारिकरणांतर्गत मौजे तिवंडेवाडी व मौजे मिरजोळे ता.जि.रत्नागिरी येथील १९.०१ हे.आर क्षेत्राचे खालीलप्रमाणे भारतीय तटरक्षक दल, रत्नागिरी यांच्याकडे हस्तांतरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| | | | |
|---|---|---|---|
| अ. | पॅरलल टॅक्सीट्रॅक | १२० मी. रुंद X १४०० मि. लांब भूपट्टी | १६.८० हे. आर |
| ब. | नेव्हिगेशन उपकरणासाठी (Nav aids) | १७० मी. रुंद X १३० मी. लांब भूपट्टी | ०२.२१ हे. आर |
| | **एकुण** | | **१९.०१ हे.आर** |

२. महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीने भारतीय तटरक्षक दल, रत्नागिरी यांना उपरोक्त "अ आणि “ब" साठी संपादीत करण्यात आलेल्या क्षेत्राचा ताबा देण्याची कार्यवाही शासनाच्या प्रचलीत नियमानुसार करावी.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. २०२३०६१३१६४४३२९७०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHILPA ABHAY CHACHAD

Digitally signed by SHILPA ABHAY CHACHAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=3f0b1454eadcb46569c38e868a5b441a8a32b442036ce5c8ffbed5e862cc4202, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=15FE38A4E995535864D6D7BC4CB39F75BB8A6906B9DA526DCB4921B96EE9B6EF, cn=SHILPA ABHAY CHACHAD
Date: 2023.06.13 17:37:22 +05'30'

**( शिल्पा चाचड )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे स्वीय सहायक.
२. अप्पर मुख्य सचिव, गृह विभाग,मंत्रालय,मुंबई.
३. अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई
४. अप्पर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय,मुंबई.
५. अप्पर मुख्य सचिव, मा.मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय,मुंबई.
६. अप्पर मुख्य सचिव( उद्योग), उद्योग,उर्जा व कामगार विभाग,मंत्रालय, मुंबई.
७. अप्पर मुख्य सचिव,सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय,मुंबई
८. अप्पर मुख्य सचिव( महसूल), महसूल व वन विभाग,मंत्रालय, मुंबई
९. प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
१०.प्रधान सचिव (ऊर्जा), उद्योग,उर्जा व कामगार विभाग,मंत्रालय,मुंबई
११.प्रधान सचिव, (विमानचालन), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,मुंबई.
१२. जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, रत्नागिरी.
१३.संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई.
१४.उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी, मुंबई.
१५.विभागीय कार्यकारी अधिकारी, भारतीय विमानपत्तन प्राधिकरण (पश्चिम क्षेत्र), मुंबई
१६.महालेखापाल, ( लेखा परीक्षा/ लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१७.उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग (कार्या.२५), मंत्रालय, मुंबई
१८. उप संचालक, विमानचालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई
१८.अधिदान व लेखा अधिकारी मुंबई
१९.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
२०. भारतीय तटरक्षक दल, रत्नागिरी.
२१. निवडनस्ती.